कार्यकारी अभियंता (स्थापत्य) यांच्या पदोन्नती आदेशात अंशत: बदल करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस-१११८/(३४३/२०१८)/आ (वर्ग-१)..(२)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
**दिनांक: २० ऑक्टोबर, २०१८.**

वाचा:- जलसंपदा विभाग, शासन आदेश क्र.एसएलएस-१११७/(३१८/२०१७)/भाग-२/आ.(वर्ग-१), दि.२१.०६.२०१८.

**शासन आदेश :-**

श्री.प्रकाश दत्तात्रय जाधव यांची संदर्भीय आदेशान्वये सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने **कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे (सिंचन)** या रिक्त पदावर पदोन्नतीने पदस्थापना करण्यात आली होती.

२. आता, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने श्री.जाधव यांच्या पदस्थापनेत प्रशासकीय कारणास्तव अंशत: बदल करुन, बदली अधिनियमातील कलम ४ (५) नुसार त्यांची सुधारित पदस्थापना **कार्यकारी अभियंता, कृष्णा सिंचन विभाग, सातारा** या श्री.वै.ह.फाळके यांच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदावर करण्यात येत आहे.

३. संबंधीत अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass1.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

४. संबंधीत अधिकाऱ्यांना शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

५. सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९

मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०१८१०२०१४३७५४८२२७** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay Namdeo Jadhav

Digitally signed by Sanjay Namdeo Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5459d36186f52b61cb47b4246001e4c0bbd80c48f89adea8f0037e8608934214, serialNumber=5d495c041ec26693ec8970305b3bf74fd0e430fcd53917c7f440a44ac2dc6a30, cn=Sanjay Namdeo Jadhav
Date: 2018.10.20 14:46:15 +05'30'

**(संजय जाधव)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) प्रधान सचिव (जलसंपदा)/ सचिव (जलसंपदा व्यवस्थापन व लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व कार्यकारी संचालक / महासंचालक, जलसंपदा विभाग.
३) सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई.
४) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
५) सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
६) महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
७) खाजगी सचिव, मा. मंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई.
८) खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (जलसंपदा),मंत्रालय, मुंबई.
९) संबंधीत अधिकारी.
१०) संबंधीत जिल्हा कोषागार अधिकारी.
११) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
१२) कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.